अर्थसंकल्पीय तरतुदींचे पुनर्वितरण

मुख्य लेखाशीर्ष "२२१७, नगर विकास".

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: कुंभमे-२०१४/प्र.क्र.६९/(नवि-१६)/नवि-२५**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक: १४ ऑगस्ट, २०१५.

वाचा : १) अपर जिल्हाधिकारी तथा मेळा अधिकारी, नाशिक यांचे क्र.सिंहस्थ १५-१६/७३३/२०१५, दि.२०.६.२०१५ चे पत्र.

२) शासन परिपत्रक, नगर विकास विभाग क्र.बीयुडी १४१५/प्र.क्र.१४३/नवि-४, दि.४.८.२०१५.

**प्रस्तावना :-**

नाशिक येथे होणाऱ्या आगामी सिंहस्थ कुंभमेळ्याच्या कामांसाठी जिल्हाधिकारी, नाशिक यांचे कार्यालयात स्वतंत्र कक्ष निर्माण करण्यात आला असून या कार्यालयातील अधिकारी / कर्मचारी यांचे वेतन, अतिकालिक भत्ता, कार्यालयीन खर्च व इतर खर्च यासाठी जिल्हाधिकारी, नाशिक यांनी रु.१३.०० कोटीची मागणी केली आहे. सन २०१५-१६ करीता ३१, सहायक अनुदान (वेतनेतर) या उद्दिष्टासाठी रु.२८०.०० कोटी इतकी अर्थसंकल्पित तरतूद उपलब्ध आहे. उक्त लेखाशीर्षाखालील ३१-सहायक अनुदान (वेतनेतर) या उद्दिष्टासाठी असलेल्या अर्थसंकल्पिय तरतुदींमध्ये पुनर्वितरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सन २०१५-१६ च्या नगर विकास विभागाच्या अर्थसंकल्पातील उपलब्ध तरतुदींपैकी मागणी क्र.एफ-२, मुख्य लेखाशीर्ष २२१७, नगर विकास, ८००, इतर खर्च, (००)(०२) सिंहस्थ कुंभमेळ्याचे नियोजन व अंमलबजावणीवरील खर्चाकरिता सहायक अनुदान (२२१७९६३४) या लेखाशीर्षाखालील ३१-सहायक अनुदान या उद्दीष्टाखालील उपलब्ध तरतुदीमधुन याच लेखाशीर्षाखालील वेतन, अतिकालिक भत्ता, कार्यालयीन खर्च व इतर खर्च या उद्दिष्टांकरीता सोबतच्या विवरणपत्र क्र.१ व २ मध्ये दर्शविल्याप्रमाणे रु.१३,००,००,०००/- (रुपये तेरा कोटी फक्त) इतक्या निधीचे पुनर्वितरण करण्यास शासन याव्दारे मान्यता देत आहे.

२. संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी विवरणपत्र क्र.१ मधील स्तंभ क्र.५ खाली दर्शविण्यात आलेल्या पुनर्वितरणानंतरच्या सुधारित तरतुदींची नोंद घेऊन सदर निधीचे वितरण व विनियोगाबाबतची पुढील कार्यवाही करावी.

३. सदर शासन निर्णय अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील नियम १६६ मधील तरतुदीनुसार, तसेच शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२,

दि.१७.४.२०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८१४१७००५०५७२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shriram Dattatraya Yadav

Digitally signed by Shriram Dattatraya Yadav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=50cb0ce4cc4fe54c74f42b86035 4e86ec00b3b36f5f215c9f7658e611006a200, cn=Shriram Dattatraya Yadav
Date: 2015.08.14 17:04:55 +05'30'

**( श्री.द.यादव )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
३. महालेखापाल (लेखा व हकदारी-१), मुंबई
४. महालेखापाल (लेखा व हकदारी-२), नागपूर
५. महालेखापाल (लेखा परीक्षा-१), मुंबई
६. महालेखापाल (लेखा परीक्षा-२), नागपूर
७. विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक
८. जिल्हाधिकारी, नाशिक
९. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक
१०.सह सचिव (नवि-४/नवि१६), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
११.निवड नस्ती (नवि-२५)

**(शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्र. कुंभमे-२०१४/प्र.क्र.६९/(नवि-१६)/नवि-२५, दिनांक १३ ऑगस्ट, २०१५ चे सहपत्र)**

**विवरणपत्र क्र.१**

**वित्तीय वर्ष २०१५-१६ मधील अर्थसंकल्पीय अनुदानाचे पुनर्वितरण**

**(रुपये हजारात)**

| अ.क्र. | पुनर्वितरणामुळे घट (-) झालेले लेखाशीर्ष (मुख्य/उप/गौण व तपशीलवार) | पुनर्वितरणाचे वेळी उपलब्ध असलेले मंजूर अनुदान | पुनर्वितरणमध्ये घट होणारी रक्कम (-) | पुनर्वितरणानंतर शिल्लक अनुदान | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | मागणी क्र.एफ-२<br>२२१७, नगर विकास<br>८००, इतर खर्च<br>(००)(०२) सिंहस्थ कुंभमेळ्याचे नियोजन व अंमलबजावणीवरील खर्चाकरिता सहायक अनुदान (२२१७९६३४)<br>३१, सहायक अनुदान (वेतनेतर) | २८०,००,०० | १२,९९,९९ | २६७,००,०१ | मुख्य लेखाशीर्ष २२१७, नगर विकास, ८००, इतर खर्च, (००)(०२) सिंहस्थ कुंभमेळ्याचे नियोजन व अंमलबजावणीवरील खर्चाकरिता सहायक अनुदान (२२१७९६३४) या लेखाशीर्षाखालील ३१, सहायक अनुदान या उद्दीष्टाखाली सन २०१५-१६ मध्ये अर्थसंकल्पित केलेल्या रु.२८०,००,०००/- इतक्या रकमेमधून खालील उद्दिष्टांकरीता पुनर्विनियोजित करण्यात येत आहे.<br>०१, वेतन<br>०३, अतिकालिक भत्ता<br>३१, कार्यालयीन खर्च<br>५०, इतर खर्च |
| | एकूण | २८०,००,०० | १२,९९,९९ | २६७,००,०१ | |

*****************

**(शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्र. कुंभमे-२०१४/प्र.क्र.६९/(नवि-१६)/नवि-२५, दिनांक १३ ऑगस्ट, २०१५ चे सहपत्र)**

## विवरणपत्र क्र.२

## वित्तीय वर्ष २०१५-१६ मधील अर्थसंकल्पीय अनुदानाचे पुनर्वितरण

**(रुपये हजारात)**

| अ.क्र. | पुनर्वितरणामुळे वाढ (+) झालेले लेखाशीर्ष (मुख्य/उप/गौण व तपशीलवार) | पुनर्वितरणाचे वेळी उपलब्ध असलेले मंजूर अनुदान | पुनर्वितरणमध्ये वाढ होणारी रक्कम (+) | पुनर्वितरणानंतर शिल्लक अनुदान | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | मागणी क्र.एफ-२<br>२२१७, नगर विकास<br>८००, इतर खर्च<br>(००)(०२) सिंहस्थ कुंभमेळ्याचे नियोजन व अंमलबजावणीवरील खर्चाकरिता सहायक अनुदान (२२१७९६३४) | | | | २२१७, नगर विकास, ८००, इतर खर्च, (००)(०२) सिंहस्थ कुंभमेळ्याचे नियोजन व अंमलबजावणीवरील खर्चाकरिता सहायक अनुदान (२२१७९६३४) या लेखाशीर्षाखालील ३१, सहायक अनुदान या उद्दीष्टाखालील सन २०१५-१६ मध्ये अर्थसंकल्पित केलेल्या रु.२८०,००,०००/- इतक्या रकमेमधून खालील उद्दिष्टांकरीता पुनर्वितरण करण्यात येत आहे.<br>०१, वेतन-७५,००<br>०३, अतिकालिक भत्ता-१००,००<br>३१, कार्यालयीन खर्च (वेतनेतर)-१०,२५,००<br>५०, इतर खर्च-१००,०० |
| | ०१, वेतन | १ | ७४,९९ | ७५,०० | |
| | ०३, अतिकालिक भत्ता | ० | १००,०० | १००,०० | |
| | ३१, कार्यालयीन खर्च (वेतनेतर) | ० | १०,२५,०० | १०,२५,०० | |
| | ५०, इतर खर्च | ० | १००,०० | १००,०० | |
| | एकूण | १ | १२,९९,९९ | १३,००,०० | |

***************